पिंपरी-चिंचवड शहर मनपाच्या हद्दित नव्याने समाविष्ट झालेल्या १८ गावातील मिळकतकराच्या थकबाकी माफी/सवलतीबाबत.

# महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग

शासन निर्णय क्रमांक- पीसीसी ३००७/३८४/प्र.क्र.११२/२००८/नवि- २२

मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.

दिनांक- २६ एप्रिल, २०१०

**संदर्भ:** १) आयुक्त, पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिका यांचे पत्र क्रमांक- कर/ मुख्य/ ६/ कावि / ८९५/ ०२००७, दिनांक १५/११/२००७ व त्यासोबतचा महासभा ठराव क्रमांक- १२०, दिनांक ६/१०/२००४.

२) आपले पत्र क्रमांक- कर/मुख्य/६/कावि/८१६/२००७, दिनांक १७/१२/२००७.

३) आपले पत्र क्रमांक- कर/मुख्य/६/कावि/१०८३/२००८, दिनांक १/२/२००८.

४) आपले पत्र क्रमांक- कर/मुख्य/६/कावि/११०४/२००८, दिनांक ७/२/२००८.

५) आपले पत्र क्रमांक- कर/मुख्य/६/कावि/१३५३/२००८, दिनांक २५/६/२००८.

६) आपले पत्र क्रमांक- कर/मुख्य/६/कावि/१४९८/२००९, दिनांक १३/२/२००९.

७) आपले पत्र क्रमांक- कर/मुख्य/६/कावि/४२२/२००७, दिनांक ५/८/२००७.

**प्रस्तावना-**

पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका क्षेत्रात दि. ११ सप्टेंबर, १९९७ च्या अधिसुचनेद्वारे १८ गावे समाविष्ट करण्यात आली. नवीन समाविष्ट गावात महानगरपालिकेने मिळकतीचे सर्वेक्षण करुन करयोग्यमुल्य निर्धारणं करुन कराची आकारणी केली. परंतु समाविष्ट गावातील कृती समिती, संघटना नागरीक यांनी गावे वगळण्याबाबत वेळोवेळी आंदोलने केली. त्यामुळे शासनाने सदर गावे वगळण्याबाबत सन २००३ मध्ये प्राथमिक अधिसुचना निर्गमित केली होती, मात्र पुढे ही अधिसुचना सन २००८ मध्ये रद्द केली. त्यामुळे नागरीकांमध्ये या गावांच्या महानगरपालिकेतील समावेशाबाबत संभ्रवस्था होती. सदर गावे वगळली जातील अशी नागरीकांना धारणा होऊन या गावातील मिळकतकर धारकांनी मिळकतकर भरला नाही. तसेच ग्रामीण भागात अद्याप पुरेशा नागरी सुविधा इत्यादी झालेल्या नाहीत अशा तक्रारी नागरीकांनी केल्याने मिळकतकर थकबाकी अनुषंगाने सवलतीबाबत महापालिका सभेने ठराव क्र. १२० दि. ६.१०.२००५ व महासभा ठराव क्र. ३९६

दि.२०.६.२००८ पारीत केलेले आहेत. त्यानुषंगाने सन १९९७ पासूनची महापालिका मालमत्ताकर व त्याअनुषंगिक शासन कर संपूर्ण माफ करण्याचा प्रस्ताव अन्य काही शिफारसींसह आयुक्तांनी शासनास मान्यतेसाठी संदर्भाधीन पत्रान्वये सादर केला आहे. त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका क्षेत्रात **नव्याने समाविष्ट झालेल्या गावांतील मिळकत धारकांना मालमत्ता कराच्या** थकबाकीतून सूट/माफी देण्याबाबत आयुक्त, पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका यांनी सादर केलेल्या प्रस्तावातील तपशिलवार बाबी व संदर्भाधीन महासभा ठराव विचारात घेवून, **मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ चे कलम १५२ (१अे)** नुसार प्राप्त अधिकारात पुढीलप्रमाणे मालमत्ताकराचे थकबाकीबाबत माफी/सवलत देण्यास या आदेशाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१) पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका क्षेत्रात नव्याने समाविष्ट झालेल्या गावांतील जे थकबाकीदार मिळकतधारक सन २०१०-२०११ या वर्षाची मालमत्ता कर व शासकिय करांची रक्कम, विषयाधीन शासन निर्णयाच्या तारखेपासून किंवा नोटिस प्राप्त झाल्यापासून यापैकी जे उशिरा होईल त्यापासून १ महिन्यात जे मालमत्ताधारक भरणा करतील, अशा मालमत्ताधारकांना मार्च, २०१० पूर्वीची थकबाकी १०० टक्के माफ राहील.

२) वरीलप्रमाणे जे थकबाकीदार मिळकतधारक उक्त-१) मध्ये नमूद कालावधीच्या, तारखेपासून २ महिन्यात सन २०१०-२०११ या वर्षाची मालमत्ताकर व शासकिय करांची रक्कम भरतील त्यांना मार्च २०१० पूर्वीच्या एकूण थकबाकी पैकी ८० टक्के थकबाकीत माफी राहील. मात्र सदरील माफी वेळीच संबंधित मालमत्ता धारकांनी उर्वरित २० टक्के थकबाकी कराचा भरणा करणे आवश्यक आहे.

३) वरील प्रमाणे जे थकबाकीदार मिळकतधारक उक्त-१) मध्ये नमूद कालावधीच्या, तारखेपासून ३ महिन्यात सन २०१०-२०११ या वर्षाची मालमत्ता कर व शासकीय करांची रक्कम भरतील त्यांना मार्च, २०१० पूर्वीच्या थकबाकी पैकी ५० टक्के थकबाकीत माफी

राहील मात्र सदरील माफी वेळीच संबंधित मालमत्ता धारकांनी उर्वरित ५० टक्के थकबाकी रकमेच्या भरणा करणे आवश्यक आहे.

४) वरील प्रमाणे रक्कम, जे थकबाकीदार मिळकतधारक उक्त-१) मध्ये नमूद कालावधीच्या, तारखेपासून ३ महिन्यानंतर सन २०१०-२०११ या वर्षाची मालमत्ताकर व शासकिय करांची रक्कम भरणा करतील त्यांना किंवा अशा मिळकतधारकांना मार्च, २०१० पूर्वीच्या थकबाकीसह सन २०१०-२०११ च्या संपूर्ण करांच्या रकमेचा भरणा करावा लागेल.

५) यापुढे या महानगरपालिकेस मालमत्ता करासंदर्भात कोणतीही अशा स्वरुपाची सवलत देता येणार नाही. तसेच संबंधित करदात्यांना यापूढे कोणतीही मालमत्ता कर विषयक सवलत अनुज्ञेय राहाणार नाही, असे देखील सदर सवलत देतांना संबंधितांना स्पष्ट करण्यात यावे.

०२. या आदेशाच्या अनुषंगाने सर्व संविधानिक बाबींची पुर्तता आयुक्त, पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिका यांनी करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(सुनिल कोटेकर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२. मा. सचिव (नवि -२) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३. आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका, पिंपरी, पुणे.
४. निवडनस्ती (नवि २२)